**सुधारित प्रशासकीय मान्यता**
**कळंभे, ता. शहापूर, जिल्हा ठाणे येथे न्यायीक अधिकाऱ्यांसाठी २ निवासस्थाने बांधण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय, क्र.सीआरक्यू-१२२२/प्र.क्र.१४१/का-१३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १० ऑगस्ट २०२३

**पहा :-**

१) प्रबंधक (निरिक्षणे-२), उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र.बी(डब्ल्यू) ६०५८/१९७४/(९)/१४८२/२४१६६, दिनांक २१ जुलै, २०२२.
२) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र.सीआरक्यू-३३०९/५७६/प्र.क्र.७५/का-१३, दिनांक ८ मार्च, २०११.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ अन्वये कळंभे, ता. शहापूर, जिल्हा ठाणे येथे न्यायीक अधिकाऱ्यांसाठी २ निवासस्थाने बांधण्यासाठी रु.३६,४१,४९५/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या पत्रान्वये कळंभे, ता. शहापूर, जिल्हा ठाणे येथे न्यायीक अधिकाऱ्यांसाठी २ निवासस्थाने बांधण्यासाठीचा सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदरहू प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कळंभे, ता. शहापूर, जिल्हा ठाणे येथे न्यायीक अधिकाऱ्यांसाठी २ निवासस्थाने बांधण्याकरिता रु.१,०४,४०,५९२/- (रुपये एक कोटी चार लक्ष चाळीस हजार पाचशे ब्याण्णव फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशील | सुधारीत प्रशासकीय मान्यता रक्कम रुपयात |
|---|---|---|
| १. | निवासस्थानांचे बांधकाम | ८९,१७,०२३/- |
| २. | विद्युतिकरण | ९,८०,८७२/- |
| ३. | वस्तू नि सेवा कर (१२%) | ३,९४,६९२/- |
| ४. | भाववाढ (४%) | १,३१,५६०/- |
| ५. | वीमा (०.५%) | १६,४४५/- |
| | **एकूण** | **१,०४,४०,५९२/-** |

२. ही सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) सुधारित प्रशासकीय मान्यतेस सहमती याचा अर्थ तांत्रीक बाबी सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासणे आवश्यक आहे.

२) मूळ प्रशासकीय मान्यतेत नमूद केलेया इतर सर्व अटी सुधारित प्रशासकीय मान्यतेबाबतही लागू राहतील.

३) बांधकाम सुरु करण्यापूर्वी नमूना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेवूनच सुरु करावे.

४) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

७) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र. बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

८) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

९) अंदाजपत्रकीय कामात बदल करु नये.

१०) सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियंत्यांनी तोंडी दिलेल्या सूचनांच्या आधारावर कामाच्या व्याप्तीत बदल किंवा नवीन कामे समाविष्ट करु नये.

११) नवीन कामांचा समावेश करावयाचा झाल्यास किंवा व्याप्तीत बदल करावयाचा झाल्यास याबाबत लेखी आदेश प्राप्त करुन विहित मुदतीत व पध्दतीने सदर कामांना मंजूरी घेण्याची कार्यवाही करावी. अन्यथा संबंधित अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

११) प्रस्तुत योजना सुधारित प्रशासकिय मान्यता किंमतीमध्ये पूर्ण करण्याची दक्षता सार्वजनिक बांधकाम विभागाने घ्यावी. तसेच, मर्यादेबाहेर विभागाने खर्च करु नये.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च उपरोक्त कामासाठी "मागणी क्र. एच-७, ४२१६, गृहनिर्माणावरील भांडवली खर्च ०१- शासकीय निवासी इमारती- ७००, इतर गृहनिर्माण, (०१) न्यायदान- केंद्रपुरस्कृत योजना, राज्यहिस्सा (०१) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२१६ ०२९१) व केंद्र हिस्सा -मोठी बांधकामे (०४) (०३) ५३ मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२१६०५२२)" या लेखाशिर्षाखाली मंजूर नियतव्ययातून खर्ची टाकण्यात यावा. मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक :१७४/२०२२/ इमा-२, दिनांक १७ ऑक्टोबर, २०२२, नियोजन विभाग, परिपत्रक, क्र.ससमा-२०१०/प्र.क्र.४८/भाग-१/का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८ मध्ये नमूद केल्यानुसार विभागास असलेल्या अधिकारानुसार व वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक ९, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार तसेच, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.व्यअस-प्र.क्र.१२०/अर्थसंकल्प-२, दिनांक १९ ऑक्टोबर, २०२२ प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०८१०१७५३३९४११२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2023.08.10 17:55:20 +05'30'

**( विलास व. गायकवाड )**
**विधि सल्लागार नि सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
४) प्रबंधक बी (डब्ल्यू ) शाखा, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
५) मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, ठाणे.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक/दोन, मुंबई व नागपूर,
७) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण.
८) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे.
९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे. (मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
११) कक्ष अधिकारी (इमा-२),सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१२) कक्ष अधिकारी (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

१३) कक्ष अधिकारी (का-१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४) अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.
१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१६) कक्ष अधिकारी, का. ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१७) निवड नस्ती/संग्रहार्थ.